मुख्यमंत्री वयोश्री योजना

**पात्र लाभार्थ्यांना निधीचे वितरण ऑनलाईन पद्धती ऐवजी ऑफलाईन पद्धतीने करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः- ज्येष्ठना-२०२२/प्रक्र.३४४/सामासु**

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२

दिनांक :- ११ मार्च, २०२४

**संदर्भ :** शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः- ज्येष्ठना २०२२/ प्र.क्र.३४४/सामासु, दि. ६ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना -**

राज्यातील ६५ वर्षे वय व त्यावरील ज्येष्ठ नागरिकांना त्यांच्या दैनंदिन जीवनात सामान्य स्थितीत जगण्यासाठी आणि त्यांना वयोमानपरत्वे येणाऱ्या अपंगत्व, अशक्तपणा यावर उपाययोजना करण्यासाठी आवश्यक सहाय्य साधने/उपकरणे खरेदी करणेकरिता तसेच मनःस्वास्थ केंद्र, योगोपचार केंद्र इ. द्वारे त्यांचे मानसिक स्वास्थ अबाधित ठेवण्यासाठी राज्यात "मुख्यमंत्री वयोश्री योजना" राबविण्यास दि. ६ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर योजनेअंतर्गत पात्र ज्येष्ठ नागरिकांना एकवेळ एकरकमी रु. ३०००/- त्यांच्या बँकेच्या वैयक्तिक आधार संलग्न बचत खात्यात थेट लाभ वितरण लाभ प्रदान करण्याचे उद्दिष्ट आहे. तसेच सदर योजनेचे नवीन स्वतंत्र पोर्टल महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून विकसित करण्यात येणार आहे.

पात्र लाभार्थ्यांच्या बँकेच्या वैयक्तिक आधार संलग्न बचत खात्यात रु. ३०००/- थेट लाभ वितरण प्रणालीद्वारे वितरीत झाल्यावर सदर योजनेअंतर्गत विहीत केलेली उपकरणे खरेदी केल्याचे तसेच मनःस्वास्थ केंद्राद्वारे प्रशिक्षण घेतल्याचे लाभार्थ्यांचे देयक (Invoice) प्रमाणपत्र ३० दिवसांच्या आत संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांच्याकडून प्रमाणित करुन संबंधित केंद्रीय सामाजिक उपक्रम (CPSU) संस्थेमार्फत विकसित पोर्टलवर अपलोड करणे आवश्यक आहे.

मात्र, सदर योजनेकरिता नवीन पोर्टल तयार करून कार्यान्वित होण्यास काही कालावधी लागणार आहे. सबब, सदर योजनेकरिताचे नवीन स्वतंत्र पोर्टल कार्यान्वित होईपर्यंत या योजनेअंतर्गत निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांच्या वैयक्तिक आधार संलग्न बँकेच्या बचत खात्यात एकवेळ एकरकमी ऑनलाईन पद्धतीने करण्याऐवजी निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांना थेट धनादेशाद्वारे एकवेळ एकरकमी रुपये ३०००/- च्या मर्यादेत ऑफलाईन पद्धतीने वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील ६५ वर्षे वय व त्यावरील ज्येष्ठ नागरिकांना त्यांच्या दैनंदिन जीवनात सामान्य स्थितीत जगण्यासाठी आणि त्यांना वयोमानपरत्वे येणाऱ्या अपंगत्व, अशक्तपणा यावर उपाययोजना करण्यासाठी पात्र वृद्ध लाभार्थ्यांना त्यांच्या शारीरिक असमर्थतता/ दुर्बलतेनुसार चष्मा, श्रवणयंत्र, ट्रायपॉड स्टिक, व्हील चेअर, फोल्डिंग वॉकर, कमोड खुर्ची, नि-ब्रेस, लंबर बेल्ट, सर्वाइकल कॉलर इ.सहाय्यभूत आवश्यक सहाय्य साधने/उपकरणे खरेदी करणेकरिता तसेच मनःस्वास्थ केंद्र, योगोपचार केंद्र इ. द्वारे त्यांचे मानसिक स्वास्थ अबाधित ठेवण्यासाठी मुख्यमंत्री वयोश्री योजनेअंतर्गत पात्र वृद्ध लाभार्थ्यांना तात्काळ लाभ देणे आवश्यक आहे. सबब, सदर योजनेकरिताचे नवीन स्वतंत्र पोर्टल कार्यान्वित होईपर्यंत या योजनेअंतर्गत निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांच्या वैयक्तिक आधार संलग्न बँकेच्या बचत खात्यात एकवेळ एकरकमी ऑनलाईन पद्धतीने करण्याऐवजी निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांना थेट धनादेशाद्वारे एकवेळ एकरकमी रुपये ३०००/- च्या मर्यादेत ऑफलाईन पद्धतीने वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा सांकेतांक २०२४०३१२१८३७०३६४२२ असा आहे .सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.03.13 18:15:17 +05'30'

**( राजेश स. मांजरेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
सर्व मा. विधानपरिषद /विधानसभा सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई-२१.

मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
सर्व अ.मु.स./प्र.सचिव/सचिव,मंत्रालय मुंबई
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
संचालक, सार्वजनिक आरोग्य, महाराष्ट्र राज्य
आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व आयुक्त, महानगरपालिका
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण /जिल्हा समाजकल्याण अधिकारी
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालक, माहिती व तंत्रज्ञान महामंडळ,मुंबई
अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,मुंबई.
सहसचिव (अर्थसंकल्प / अजाक), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी/जिल्हा शल्य चिकित्सक
जिल्हा महिला बालविकास अधिकारी
निवडनस्ती